**लक्की मेन्शन, इ.क्र.४६-५०, मिर्झा गालिब रोड (क्लेअर रोड), भायखळा, मुंबई ४०० ००८ येथील भुकर पाहणी क्र.१५१० हा ३९८ चौ.मी. क्षेत्रफळाचा भुखंड व त्यावरील इमारतीचे नियोजीत लक्की मेन्शन सहकारी गृहनिर्माण संस्थेकरिताचे भूसंपादन रद्द करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय, क्र.सगृस-२००३/प्र.क्र.२०१/दुवपु.२**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक:- २४.०४.२०१५**

पहावे:- १. शा.नि.क्र.सगृस-२००३/प्र.क्र.२०१/दुवपु.२, दि.२०.१०.२००५.
२. उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, म्हाडा यांचे
पत्र क्र. उपा.तथा मुकाअ/प्रा/दुवपु/३१२३/११, दि.२२.६.२०११. व
पत्र क्र.मुअ/निकाअ/दुवपु/एफ-ई ३१/८३३८/दुवपु१३, दि.३०.१०.२०१३.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास अधिनियम, १९७६ च्या कलम १०३-ब(४) मधील तरतुदीनुसार शासनास असलेल्या शक्तीस अनुसरुन संदर्भ क्र.१ च्या दि.२०.१०.२००५ च्या शासन निर्णया अन्वये लक्की मेन्शन, इ.क्र.४६-५०, क्लेअर रोड, मिर्झा गालिब रोड, भायखळा, मुंबई ४०० ००८ येथील भुकर पाहणी क्र.१५१० हा ३९८ चौ.मी. क्षेत्रफळाचा भुखंड व त्यावरील इमारतीचे नियोजीत लक्की मेन्शन सहकारी गृहनिर्माण संस्थेकरिता भुसंपादन करण्यास शासनाची मान्यता देण्यात आली होती.

२. उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, म्हाडा यांनी त्यांच्या संदर्भाधीन दि.२२.६.२०११ च्या पत्राव्दारे मे.लिंग्रास कन्स्ट्रक्शन यांनी वास्तुविशासद मे.जे.जी.कावा यांचेमार्फत उपरोक्त भूसंपादनाची कार्यवाही रद्द करण्याबाबत केलेल्या विनंतीच्या अनुषंगाने, सदर भूसंपादनासंदर्भात म्हाड अधिनियम १९७६ च्या कलम ९३(३) व ९३(४) पर्यंतच कार्यवाही करण्यात आली असल्याने व कलम ९३(५) ची कार्यवाही अद्यापि झालेली नसल्याने तसेच इमारतीमधील ७० टक्के पेक्षा जास्त भाडेकरु/रहिवाशांनी भूसंपादनाची कार्यवाही मागे घेण्याची विनंती केल्याचे कळवून सदर भुसंपादन रद्द करण्याची विनंती केलेली आहे.

३. म्हाड अधिनियम कलम ९३(५) खालील अधिसूचना अद्यापि जारी करण्यात आलेली नाही व उपरोक्त मालमत्ता मंडळाकडे अद्यापि निहित झालेली नाही. इमारतीच्या ३७ भाडेकरु/रहिवाशांपैकी २७ (७२.९७ टक्के) भाडेकरु/रहिवाशांनी भुसंपादनाची प्रक्रीया रद्द करण्यास सहमती दिलेली आहे. इमारतीची धोकादायक स्थिती विचारात घेता इमारतीचा पुनर्विकास आवश्यक असून भुसंपादन प्रक्रीया रद्द केल्याने सदर इमारतीचा पुनर्विकास वि.नि.नि.३३(७) अंतर्गत करणे शक्य होणार आहे. तसेच १०३ (ब) अन्वये ९३(५) पुढील कार्यवाही मा.सर्वोच्च न्यायालयासमोर प्रलंबित असलेल्या एस.एल.पी.क्र.५३०२/१९९२ अन्वये पारीत आदेशांमुळे सद्य:स्थितीत होऊ शकणार नसल्यामुळे भूसंपादनाच्या अर्धवट कार्यवाहीमुळे मालमत्तेचा पुनर्विकासही अडकून पडण्याची शक्यता विचारात घेता

**शासनाच्या दि.२०.१०.२००५ च्या शासन निर्णया अन्वये लक्की मेन्शन, इ.क्र.४६-५०, मिर्झा गालिब रोड (क्लेअर रोड), भायखळा, मुंबई येथील भुकर पाहणी क्र.१५१० हा ३९८ चौ.मी. क्षेत्रफळाचा भुखंड व त्यावरील इमारतीचे नियोजीत लक्की मेन्शन सहकारी गृहनिर्माण संस्थेकरिता भुसंपादन करण्यास देण्यात आलेली मंजूरी याव्दारे रद्द करण्यात येत आहे.**

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेतांक २०१५०४२४१२४१००९१०९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vikram Vishnu Nikam

Digitally signed by Vikram Vishnu Nikam
DN: CN = Vikram Vishnu Nikam, C = IN, S = Maharashtra, O = Govt Of Maharashtra, OU = Housing Department
Date: 2015.04.24 13:19:03 +05'30'

**( विक्रम निकम )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन बांद्रा (पूर्व), मुंबई ४०० ०५१.
२. आयुक्त, महापालिका, बृहन्मुंबई महानगरपालिका, पालिका मार्ग, मुंबई-१.
३. मुख्य अधिकारी,मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळ,गृहनिर्माण भवन,वांद्रा (पूर्व),मुंबई-५१.
४. सहमुख्य अधिकारी(दुवपु), मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळ, गृहनिर्माण भवन, वांद्रा (पूर्व), मुंबई-५१.
५. मुख्य अभियंता, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रा (पूर्व), मुंबई-५१.
६. विशेष भुसंपादन अधिकारी, मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळ, गृहनिर्माण भवन, वांद्रा (पूर्व), मुंबई-५१.
७. जिल्हाधिकारी, मुंबई (सर्व्हे ब्रँच).
८. नगर अभियंता, बृहन्मुंबई महानगरपालिका, पालिका मार्ग, मुंबई-१.
९. कर निर्धारक व संकलक, डी विभाग, बृहन्मुंबई महापालिका, महानगरपालिका कार्यालय, इमारत जीवन पुत्रा कंपाऊंड, नाना चौक, मुंबई- ४०० ००७.
१०.विभाग अधिकारी, ई वॉर्ड, १० साखळी स्ट्रीट, भयखळा, मुंबई ४०० ०१०.
११.उपमुख्य अभियंता, मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळ, रजनी महल, एअर कंडीशन मार्केट जवळ, ताडदेव, मुंबई ४०० ०३४.
१२.कार्यकारी अभियंता, सहकारी संस्था कक्ष, मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळ, गृहनिर्माण भवन, वांद्रा (पूर्व), मुंबई-५१.
१३. दुवपु-२ (निवड नस्ती).